**पुणे महानगरपालिका**
पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर लघुलेखक, वाहनचालक या संवर्गातील पदे नव्याने निर्माण करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
**शासन निर्णय क्र. पीएमसी ३००८/सं.क्र.१२४५/प्र.क्र. ४८०/०८/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- १७ जून, २००९**

**वाचा** :- (१) आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/उआ (जि.घ.)/से/११०७, दि.५/८/२००८ व यासोबतचा मनपा ठराव क्र. ६३९ दि. ३.२.२००६

(२) आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे पत्र क्र.उआ (जि.घ.)/से/१७७६, दि.९/२/२००९ व यासोबतचा मनपा ठराव क्र. ४१३ दि. २२.२.२००८

(३) आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे पत्र क्र.उआ (जि.घ.)/से/२१७६, दि.२३.१०.२००९

**प्रस्तावना** : आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांनी विषयांकित प्रस्ताव सादर करतांना नमूद केले आहे की, पुणे महानगरपालिकेच्या व्हेईकल डेपो व अग्निशामकदल या विभागाकडे एकुण ६९८ वाहने असून त्यापैकी ट्रेलर, जेसीबी व पोकलॅन अशी ५४ वाहने वगळता ६४४ वाहने वापरात आहेत. आयातकर, आरोग्य, पाणी पुरवठा व अग्निशामकदल या कार्यालयाकडे काही ठिकाणी २ पाळ्या व काही ठिकाणी ३ पाळ्यात काम केले जाते. त्यासाठी १६० जादा मोटार सारथी लागतात असे एकूण ७४४ मोटार सारथींची आवश्यकता आहे. पुणे महानगरपालिकेकडे मोटार सारथी (वाहनचालक) या पदाच्या ५६५ शेड्युलमान्य जागा आहेत त्यापैकी १५ जागा रिक्त आहेत. सबब त्यामुळे पुणे महानगरपालिकेकडे ५५० मोटार सारथी प्रत्यक्षात उपलब्ध आहेत.

पुणे महानगरपालिकेत शेजारील २३ गावे समाविष्ट झाल्याने पुणे महानगरपालिकेचे कार्यक्षेत्र वाढले असल्याने नागरिकांना सुविधा देणेकरीता वाहने खरेदी करण्यात आली आहेत. मात्र मोटार सारथींची (वाहनचालक) संख्या कमी असल्याने कामकाजामध्ये अडचणी निर्माण होत आहेत. त्यामुळे पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर वाहनचालकांची १०० तसेच लघुलेखकांचे १ पद अशी एकुण १०१ पदे नव्याने निर्माण करण्याच्या प्रस्तावास शासनाची मान्यता देण्याची विनंती संदर्भाधीन पत्रान्वये आयुक्त, पुणे

महानगरपालिका, पुणे यांनी केली आहे. पुणे महानगरपालिका क्षेत्राची व्याप्ती, त्यांचेकडील वाहनांची संख्या त्यांच्या वापराची निकड या बाबी विचारात घेऊन सदर आयुक्तांच्या प्रस्तावास मान्यता देण्यांची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचा प्रस्ताव व त्यातील मुद्दे आणि महानगरपालिका मुख्य सभा ठराव क्र. ४१३ दिनांक २२.८.२००८ विचारात घेवून, पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर खालील पदे नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५१ (४) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | वाहनचालक (मोटार सारथी) | ३०५०-४५९० | १०० |
| २. | लघु-टंकलेखक (स्टेनो-टायपिस्ट) | ४३००-१००४५ | १ |
| | | एकूण | १०१ |

२. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांनी या पदानुषंगिक सर्व संविधानिक बाबींची पूर्तता करुन पदे भरावीत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
(२) सचिव, (नवि-२) नगर विकास यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
(३) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे,
(४) निवडनस्ती, नवि-२२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२